**प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेचा लाभ जास्तीत जास्त तरुणांना मिळावा यासाठी या योजनेचा प्रचार, प्रसार व समन्वयासाठी जिल्हास्तरावर गठित मुद्रा बँक योजना जिल्हा समन्वय समितीस निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलबीसी-१६२०/प्र.क्र.६७/का.१४१७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ ऑक्टोबर, २०२०.

**वाचा:**

नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसएलबीसी १६१६/प्र.क्र.४९/का.१४१७ दि.१४ जून, २०१६.

**प्रस्तावना:**

नियोजन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये "प्रधानमंत्री मुद्रा बँक योजना" ग्रामीण, दुर्गम आणि अती दुर्गम भागात प्रभावीपणे माहिती होण्यासाठी आणि या योजनेचा लाभ गरजू आणि होतकरु व्यक्ती आणि बेरोजगार यांना व्हावा या हेतूने ग्रामीण आणि दुर्गम भागातील जनमानसात प्रभावीपणे प्रचार, प्रसार आणि समन्वय करण्याकरिता जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली प्रधानमंत्री मुद्रा बँक योजना समन्वय समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयास अनुलक्षून प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेचा प्रचार व प्रसिध्दी करण्याकरिता सन २०१६-१७ या वित्तीय वर्षापासून जिल्ह्यांच्या मागणीनुसार व लोकसंख्येच्या प्रमाणात प्रत्येक वर्षी जिल्हास्तरीय समन्वय समितीस निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. सन २०१९-२० मधील वितरित केलेल्या निधीपैकी जळगाव, हिंगोली, चंद्रपूर, औरंगाबाद, सांगली व गडचिरोली या ६ जिल्ह्यांना बीम्स प्रणालीवरील तांत्रिक अडचणीमुळे दिनांक २२ मार्च, २०२० नंतर कोणतेही देयक कोषागारात सादर करता आले नाहीत. त्यामुळे या ६ जिल्ह्यांनी सन २०१९-२० मधील प्रचार व प्रसिध्दीच्या कामाचे प्रलंबित देयके अदा करण्यासाठी सन २०२०-२१ मधील उपलब्ध निधीमधून निधी उपलब्ध करुन देण्याबाबत शासनास विनंती केली आहे. त्यानुसार या ६ जिल्ह्यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

जिल्हा जळगाव, औरंगाबाद, चंद्रपूर, हिंगोली, सांगली व गडचिरोली येथील जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या प्रधानमंत्री मुद्रा बँक योजना जिल्हास्तरीय समन्वय समितीस संदर्भाधीन शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांच्या अधिन राहून सन २०१९-२० मधील मुद्रा बँक योजनेचा प्रचार, प्रसार आणि समन्वय कामांची प्रलंबित देयके संबंधितांना अदा करण्याकरिता खालीलप्रमाणे एकूण रू. ९१,८४,०००/- (अक्षरी रूपये एक्याण्णव लाख चौऱ्याऐंशी हजार फक्त) निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मुद्रा बँक योजना जिल्हा समन्वय समिती | सन २०१९-२० मधील प्रलंबित देयकांची अदायगी करण्यासाठी जिल्हयाकडून मागणी रक्कम | सन २०२०-२१ मधून प्रलंबित देयकासाठी वितरित करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | जळगाव | २०,००,०००/- | २०,००,०००/- |
| २ | सांगली | २१,००,०००/- | २१,००,०००/- |
| ३ | औरंगाबाद | ११,८९,०००/- | ११,८९,०००/- |
| ४ | हिंगोली | ५,४७,०००/- | ५,४७,०००/- |
| ५ | गडचिरोली | १२,४८,०००/- | १२,४८,०००/- |
| ६ | चंद्रपूर | २१,००,०००/- | २१,००,०००/- |
| **एकूण** | | **९१,८४,०००/-** | **९१,८४,०००/-** |

**(एक्याण्णव लाख चौऱ्याऐंशी हजार फक्त)**

१. उपरोक्त निधी खर्च करताना संदर्भाधिन शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. उपरोक्त निधी हा संबंधित जिल्हाधिकाऱ्यांच्या अधिनस्त ठेवण्यात यावा. सदर निधी कोषागार कार्यालयातून आहरित व संवितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी हे “नियंत्रक अधिकारी” राहतील, तसेच संबंधित “जिल्हा नियोजन अधिकारी” हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

४. उपरोक्त निधी हा लेखाशीर्ष मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०१) नियोजन विभाग, (०१) (११) मुद्रा बँक योजनेचा प्रचार, प्रसार आणि समन्वय (योजनांतर्गत) (दत्तमत), २६ जाहिरात व प्रसिध्दी (३४५१ अे ००१) या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२९१७२८४८३७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRADNYA MAHALE

Digitally signed by PRADNYA MAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=31c8683f52ccbefd97bce49983c4151d2caf1c185c657ea855ac85f31e5f681e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f0b9244e8f45f12e0a399cd036d6d3767c67c8349951e3e5047b7469a24cdfb2, ou=PLANNING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRADNYA MAHALE
Date: 2020.10.29 17:32:16 +05'30'

**( प्रज्ञा महाले )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई

२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. सर्व सन्माननीय विधानसभा सदस्य व विधानपरिषद सदस्य व संसद सदस्य
१०.मा.मंत्री व मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११.मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२.महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१३.महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१४.महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१५.महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई.
१६.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१७.जिल्हाधिकारी, जळगाव, औरंगाबाद, चंद्रपूर, हिंगोली, सांगली व गडचिरोली
१८.जिल्हा नियोजन अधिकारी, जळगाव, औरंगाबाद, चंद्रपूर, हिंगोली, सांगली व गडचिरोली
१९.जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव, औरंगाबाद, चंद्रपूर, हिंगोली, सांगली व गडचिरोली
२०.वित्त विभाग/व्यय-८, अर्थ-१६, मंत्रालय, मुंबई ३२.
२१.कार्यासन अधिकारी (का.१४११/१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
२२.निवडनस्ती, कार्यासन १४१७.